अंगणवाडी इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषद, यवतमाळ यांना सन २०१०-११ व २०११-१२ मध्ये प्राप्त झालेल्या निधीपैकी अखर्चित निधी सन २०१५-१६ मध्ये खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१४/प्र.क्र.७८/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० सप्टेंबर, २०१५

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय, दि.६ जून, २००८
२) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण), जिल्हा परिषद, यवतमाळ यांचे क्र.एबाविसंया/कक्ष/सांस/६९९/२०१४, दिनांक १५/०५/२०१४ चे पत्र.
३) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण), जिल्हा परिषद, यवतमाळ यांचे क्र.एबाविसंया/कक्ष/सांस/८४९/२०१४, दिनांक २१/०६/२०१४ चे पत्र.
४) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण), जिल्हा परिषद, यवतमाळ यांचे क्र.एबाविसंया/कक्ष/सांस/९९०/२०१४, दिनांक १०/०७/२०१४ चे पत्र.
५) शासन निर्णय वित्त विभाग, क्र.संकीर्ण-१०.१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय, दिनांक २५/०८/२०१५

**प्रस्तावना :-** वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ च्या दिनांक ६ जून, २००८ च्या शासन निर्णयानुसार अखर्चित अनुदान हे लगतच्या एक वर्षापर्यंत खर्च करण्यास अनुमती आहे. जिल्हा परिषद, यवतमाळ यांना जिल्हा वार्षिक योजना (DPDC), ग्रामीण पायाभूत विकास निधी, १३ वा वित्त आयोग आणि मानव विकास मिशन अंतर्गत रु.२७१४.५० लक्ष इतका निधी सन २०१०-११ व २०११-१२ या वर्षात अंगणवाडी बांधकामासाठी उपलब्ध करुन देण्यात आला होता. तथापि यवतमाळ जिल्हयात जागेचा वाद व इतर करणांमुळे सदर निधीपैकी रु.७८५.०० लक्ष इतका निधी अखर्चित राहिला होता. सदर अखर्चित निधी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात खर्च करण्यास परवानगी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** सन २०१०-११ व २०११-१२ या आर्थिक वर्षात जिल्हा परिषद, यवतमाळ यांना जिल्हा वार्षिक योजना (DPDC), ग्रामीण पायाभूत विकास निधी, १३ वा वित्त आयोग आणि मानव विकास मिशन या बाबी अंतर्गत रु.२७१४.५० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी यवतमाळ जिल्हयात जागेचा वाद व इतर कारणांमुळे रु.७८५.०० लक्ष इतका निधी अखर्चित राहिला होता. याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी वरील सर्व स्त्रोतामधून प्राप्त झालेला निधी व शिल्लक निधीबाबत आढावा घेतला असून त्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर अखर्चित निधी रु.७८५.०० लक्ष सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात दिनांक ३१/०३/२०१६ पर्यंत खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) जी कामे भौतिकदृष्टया पुर्ण झाली आहेत व खर्चाच्या परवानगी अभावी देयकाचे प्रदान होऊ शकत नाही अशा कामावर निधी खर्च करण्यात यावा. तसेच त्या कामावर इतर स्त्रोतातून खर्च न झाल्याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी करावी.

आ) जी कामे सुरु होऊन भौतिकदृष्टया अपुर्ण आहेत ती कामे पुढील दिनांक ३१/०३/२०१६ पर्यंत पुर्ण होतील असे नियोजन करुन सदर निधी दिनांक ३१/०३/२०१६ पर्यंत खर्च करण्यात येईल याची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी घ्यावी.

इ) जी कामे अद्याप सुरु झालेली नाहीत त्या कामांचा निधी तात्काळ शासनास समर्पित करावा.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०.१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय, दिनांक २५/०८/२०१५ अन्वये अखर्चित निधी खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१०१०२४०५०३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasave Vijesing F

Digitally signed by Vasave Vijesing F
DN: CN = Vasave Vijesing F, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Women and Child Department
Reason: I am the author of this document
Date: 2015.09.10 11:29:36 +05'30'

**(वि. फ. वसावे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई नागपूर
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई
३) जिल्हाधिकारी, यवतमाळ
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
५) उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण), जिल्हा परिषद, यवतमाळ
६) वित्त विभाग, व्यय-६ व अर्थोपाय शाखा, मंत्रालय, मुंबई
७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ
९) महिला व बाल विकास विभाग, कार्या.४, मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती / का.६